उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियांनाअंतर्गत विविध योजना व प्रकल्प राबविण्यासाठी पदनिर्मिती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजिअ २०१७/प्र.क्र.५९/योजना-३**
बांधकाम विभाग, २५, मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: ७ जुलै, २०१७

संदर्भ

१) **शासन निर्णय क्रमांकः एनआरएलएम २०११/प्र.क्र.१९६/योजना-३, दिनांक१८ जुलै, २०११**
२) **शासन निर्णय क्रमांकः एनआरएलएम २०११/प्र.क्र.४२/योजना-३, दिनांक ३१.३.२०१२**
३) **शासन निर्णय क्रमांकः मजीअ २०१३/प्र.क्र.३६/योजना-३, दि.२०.३.२०१३**
४) **शासन निर्णय क्रमांकः मजीअ २०१३/प्र.क्र.१४३/योजना-३, दि.२१.५.२०१३**
५) **मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तर सचिव समितीच्या दि.१९.५.२०१७ च्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त.**

प्रस्तावना -

केंद्र शासनाने स्वर्ण जयंती ग्रामस्वरोजगार योजनेचे रुपांतर राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान स्वरुपात राबविण्याचा निर्णय सन - २०११ मध्ये घेतला. राज्य शासनाने सदर अभियान राज्यात राबविण्याबाबतचा निर्णय वरील संदर्भीय क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये घेतला. सदर अभियान राज्यात राबविण्यासाठी राज्य शासनाने महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान ही संस्था, सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट, १८६० अंतर्गत गठीत केली आहे. राज्यात राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान राबविण्यासाठी राज्य शासनाने महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांकरीता वरील संदर्भीय शासन निर्णयान्वये मनुष्यबळ उपलब्ध करुन दिलेले आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत विविध योजना राबविण्याबाबतचा निर्णय घेतला असून त्याअनुषंगाने आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्याचप्रमाणे राज्य शासनाने नवीन योजना सुरु केल्या असून त्या योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांमार्फत करण्याचा निर्णय घेतला आहे. वरील योजनांची अंमलबजावणी करण्याकरीता उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अतिरिक्त मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याकरीता नवीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय -

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत विविध योजना राबविण्याबाबतचा निर्णय घेतला असून त्याअनुषंगाने आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्याचप्रमाणे राज्य शासनाने नवीन योजना सुरु केल्या आहेत. या योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांमार्फत करण्याचा निर्णय घेतला आहे. वरील योजनांची अंमलबजावणी करण्याकरीता महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत योजनानिहाय सोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे नवीन पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरील पदांच्या अर्हतेमध्ये आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांना देण्यात येत आहेत.

राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत Intensive पध्दतीने राबविण्यात येणाऱ्या ३६ तालुक्यामध्ये वरील संदर्भीय क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये पदांचा आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. त्यानंतर केंद्र शासनाने intensive पध्दतीने राबविण्यात येणाऱ्या तालुक्यांमध्ये अतिरिक्त ९८ तालुक्यांचा समावेश करण्यास मान्यता दिली आहे. Intensive पध्दतीने राबविण्यात येणाऱ्या तालुक्यांकरीता निधी जागतिक बँकेकडून प्राप्त होत असतो. सदर प्रकल्प हे विहित कालावधीत राबविणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेऊन intensive पध्दतीने राबविण्यात येणाऱ्या सर्व तालुक्यांकरीता वरील संदर्भीय कमांक ४ येथील शासन निर्णायान्वये मंजूर करण्यात आलेल्या आकृतिबंधानुसार पदे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे. यापुढे Intensive म्हणून रुपांतरीत / घोषित होणारे जिल्हे व तालुक्यांमध्ये संदर्भीय क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये मंजूर आकृतीबंध लागू राहील.

या पदांवरील नियुक्त्यांचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियाना यांना राहतील. सदरची नवीन पदे भरताना प्रचलित असलेल्या नियम व धोरणांनुसार कार्यवाही करावी.

या पदांवरील वेतन / मानधन व अनुषंगिक भत्ते यावरील खर्च संबंधित योजनांच्या अनुज्ञेय प्रशासकीय / प्रकल्प निधीतून भागविण्यात यावा. सदर पदे संबंधित योजना चालू असेपर्यंतच अस्तित्वात राहतील.

सदरचा शासन निर्णय मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तर सचिव समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०६१२४४२७३३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.07.10 11:07:14 +05'30'

**असीम गुप्ता**
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचि.व, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. विधान सभा व विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता व लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य-१ व २, मुंबई / नागपूर.

८. संचालक, अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. संचालक, निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, (सर्व).
११.विभागीय आयुक्त, सर्व.
१२.जिल्हाधिकारी, सर्व.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व).
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जिवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई.
१५.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१७.उप सचिव, नियोजन (का-१४११/१४१४/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१८. उप सचिव, वित्त विभाग (का.व्यय-१५ व अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१९.उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व.
२०.प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.
२१.अतिरिक्त संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
२२.निवडनस्ती (योजना-३).

परिशिष्ट -अ

शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांक: मजिअ २०१७/प्र.क्र. ५९/योजना-३, दिनांक ७ जुलै, २०१७ सोबतचे सहपत्र

| | महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान दिनदयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDUGKY) | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | नियुक्तीचा प्रकार | अर्हता | वेतन / मानधन |
| १ | State Mission Manager (Mobilization, Counseling, Jobs Fairs) (राज्यस्तर) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यताप्राप्त विद्यापिठातुन समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण १० वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ७ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ९०,०००/- |
| २ | Mission Manager (PIA Coordination, Development) (राज्यस्तर) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यताप्राप्त विद्यापिठातुन समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ६०,०००/- |
| ३ | राज्य अभियान व्यवस्थापक (IT & Biometric) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून MCA किंवा MCM किंवा MBA (Systems) किंवा MBA (IT) किंवा information Technology किंवा PGDCA किंवा M.Sc.-IT किंवा PG Engineering in IT किंवा M.Sc. in Computer विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे | रु. ६०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ICT क्षेत्रातील ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैंकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, रोजगार व कौशल्य विकास इत्यादी क्षेत्रातील ICT विषयक वरिष्ठ व्यवस्थापक म्हणून काम करण्याचा अनुभव असणे आवश्यक आहे. | |
| ४ | Mission Manager (Finance and Proposal Examination) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून Business administration in finance किंवा Commerce किंवा Economics किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पुर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैंकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ६०,०००/- |
| ५ | राज्य अभियान व्यवस्थापक (Pedagogy & learning management) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यताप्राप्त विद्यापिठातुन समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development/Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ६०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | Mission Manager (Alumni migration support, placement retention, traveling, career progression tracking) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यताप्राप्त विद्यापिठातुन समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ६०,०००/- |
| ७ | Mission Manager (Inspection, Quality, Assurance & Branding) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून Business administration in marketing किंवा Business administration in Supply Chain Management किंवा समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | रु. ६०,०००/- |
| ८ | Mission Manager (Coordinator with State skill mission and other state skill | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे | रु. ६०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | initiatives) | | | आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी, समुदाय संघटन, रोजगार व कौशल्य विकास, मनुष्यबळ व्यवस्थापन इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ व्यवस्थापक या पदावरील असणे आवश्यक आहे. | |
| **वरील सर्व राज्य अभियान व्यवस्थापक व अभियान व्यवस्थापक हे मुख्य परिचालन अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांना अहवाल सादर करतील तर मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांच्या नियंत्रणाखाली काम करतील.** | | | | | |
| | Skill Coordinator (तालुका स्तर) | ३५१ | बाह्य यंत्रणेद्वारे | अ) मान्यता प्राप्त विद्यापीठामधून कोणत्याही शाखेचा पदवीधर असणे आवश्यक आहे.<br>ब) उमेदवारांस एकूण तीन वर्षाचा रोजगार व कौशल्य विकास क्षेत्रातील अनुभव असणे आवश्यक आहे.<br>क) BSW किंवा MSW असणाऱ्या उमेदवारांना प्राधान्य दिले जाईल. | रु. २०,५००/- |
| | **एकूण** | ३५९ | | | |
| | **विशेष कृती संगम प्रकल्प (तालुकास्तर)** | | | | |
| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | नियुक्तीचा प्रकार | अर्हता | वेतन / मानधन |
| १ | कृतीसंगम सुलभकर्ता | ९ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैकी ३ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, कृतीसंगम, रोजगार हमी योजना, स्वच्छता व आरोग्य, पोषण आहार, गरीबी निर्मुलन, स्वयं सहाय्यता गट बांधणी इत्यादी | रु. २४,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | क्षेत्रातील अनुभव असणे आवश्यक आहे. | |
| **आर्थिक समावेशन सुमतिबाई सुकळीकर उद्योगिनी महिला सक्षमीकरण योजना (राज्य स्तर)** | | | | | |
| १ | अभियान व्यवस्थापक (Interest Subvention) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून MBA in Finance किंवा Banking किंवा Commerce या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ७ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैंकी ४ वर्षाचा अनुभव हा ग्रामीण क्षेत्रात आर्थिक समावेशन, स्वयं सहाय्यता गटांचे वित्तीय पुरवठा, बँकेत सुक्ष्म वित्तीय पुरवठा इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ पदावरील अनुभव असणे आवश्यक आहे. व्याजावरील अनुदान वितरणाचा अनुभव असल्यास प्राधान्य देण्यात येईल. | रु. ६०,०००/- |
| २ | प्रकल्प कार्यकारी | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून MBA in Finance किंवा Banking किंवा Commerce या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ५ वर्षाचा अनुभव, ग्रामीण क्षेत्रात आर्थिक समावेशन, स्वयं सहाय्यता गटांचे वित्तीय पुरवठा, बँकेत सुक्ष्म वित्तीय पुरवठा इत्यादी क्षेत्रातील वरिष्ठ पदावरील अनुभव असणे आवश्यक आहे. व्याजावरील अनुदान वितरणाचा अनुभव असल्यास प्राधान्य देण्यात येईल. | रु. ५०,०००/- |
| ३ | तांत्रिक सहाय्यक | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून B.Sc. Computer किंवा BCA किंवा BCM किंवा B.Sc.-IT किंवा Engineering in IT या विषयातील पदवी किंवा Diploma in Computer Software Hardware & Network Engineering किंवा Post graduate diploma in software engineering (PGDSE) किंवा Post graduate diploma in Computer software Technology (PGDCST) किंवा Advance Diploma in Computer Software | रु. २५,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | Technology (ADCST) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास ICT क्षेत्रातील २ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. | |
| | **एकूण** | ३ | | | |
| | **आमदार आदर्श व सांसद आदर्श ग्राम योजना कक्ष (राज्य स्तर)** | | | | |
| | उपसंचालक | १ | प्रतिनियुक्तीने | महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मधून प्रतिनियुक्तीने | ग्रेड पे ६,६००/- |
| | प्रकल्प कार्यकारी (SAGY) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैंकी ३ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, कृतीसंगम, ग्रामविकास नियोजन, समुदाय संघटन, गरीबी निर्मुलन, आरोग्य, स्वच्छता इत्यादी क्षेत्रातील अनुभव असणे आवश्यक आहे. | रु. ५०,०००/- |
| | प्रकल्प कार्यकारी (AAGY) | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून समाजकार्य (MSW) किंवा ग्रामविकास किंवा ग्रामविकास व्यवस्थापन किंवा Development Studies किंवा Social Entrepreneurship Development / Entrepreneurship Development या विषयातील पदव्युत्तर पदवी किंवा पदव्युत्तर पदवीका (दोन वर्ष) पूर्ण असणे आवश्यक आहे. उमेदवारास एकूण ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. त्यापैंकी ३ वर्षाचा अनुभव हा ग्रामविकास, कृतीसंगम, ग्रामविकास नियोजन, समुदाय संघटन, गरीबी निर्मुलन, आरोग्य, स्वच्छता इत्यादी क्षेत्रातील अनुभव असणे आवश्यक आहे. | रु. ५०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | सहायक | २ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून कोणत्याही शाखेतील पदवी परीक्षा उत्तीर्ण, इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि., मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि., उत्तीर्ण व MS-CIT उत्तीर्ण आवश्यक तसेच उमेदवारास शासकीय किंवा संस्था किंवा कंपनीमधील कामाचा किमान दोन वर्षाचा अनुभव असणे आवश्यक आहे. मराठीचे ज्ञान असणे आवश्यक आहे. | रु. २५,०००/- |
| | **एकूण** | **५** | | | |
| | **नियामक व उत्तर दायित्व कक्ष (राज्य स्तर)** | | | | |
| | हेल्पलाईन ऑपरेटर | २ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून कोणत्याही शाखेतील पदवी परीक्षा उत्तीर्ण, इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि., मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि., उत्तीर्ण व MS-CIT उत्तीर्ण आवश्यक तसेच उमेदवारास शासकीय संस्था किंवा कंपनीमध्ये किमान दोन वर्षाचा अनुभव व मराठीचे ज्ञान असणे बंधनकारक आहे. हेल्पलाईन ऑपरेटर म्हणून कामाचा अनुभव असल्यास तसेच महिला उमेदवारांना प्राधान्य दिले जाईल. | रु. १५,०००/- |
| | हेल्पलाईन सहायक | १ | बाह्य यंत्रणेद्वारे | मान्यता प्राप्त विद्यापीठामधून कोणत्याही शाखेतील पदवी परीक्षा उत्तीर्ण, इंग्रजी टंकलेखन ४० श.प्र.मि., मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि., उत्तीर्ण व MS-CIT उत्तीर्ण आवश्यक तसेच उमेदवारास शासकीय संस्था किंवा कंपनीमध्ये प्रशासकीय कामाचा किमान तीन वर्षाचा अनुभव व मराठीचे ज्ञान असणे बंधनकारक आहे. हेल्पलाईन क्षेत्रात कामाचा अनुभव असल्यास प्राधान्य दिले जाईल. | रु. २५,०००/- |
| | **एकूण** | **३** | | | |